मत्स्य व्यवसायाकरीता जलाशय/तलाव ठेक्याने देण्यासाठी सुधारीत धोरण.........

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि २०१६/प्र.क्र.१७१/पदुम १३**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२**
**दिनांक : ३० जून, २०१७**

वाचा:- १)शासन निर्णय क्रमांक : कृषि व पदुम विभाग क्र .मत्स्यवि २०१४/प्र.क्र.९/पदुम १३, दि.२६ जून,२०१४

२) शासन पत्र क्र.मत्स्यवि-१२१४/प्र.क्र.१०१/पदुम १३, दिनांक १६ मे, २०१६

३) शासन परिपत्रक क्र.मत्स्यवि-२०१४/प्र.क्र.९/भाग १/पदुम १३,दिनांक १७ मे, २०१६.

**प्रस्तावना -**

प्रथिनेयुक्त खादयपदार्थात मासे हा अतिशय महत्वाचा घटक आहे त्यादृष्टीने राज्यातील मत्स्यउत्पादन वाढीस लागून प्रथिने उपलब्धतेत वाढ व्हावी यासाठी मत्स्यव्यवसाय विभाग सतत प्रयत्नशील आहे. राज्यामध्ये उपलब्ध असलेला जलसाठा व भूजलाशयीन क्षेत्रामध्ये मासेमारीसाठी मोठया प्रमाणावर असलेला वाव लक्षात घेऊन सहकारी संस्थां व खाजगी उदयोगांच्या सहकार्याने पारंपारिक मच्छिमारांच्या हितासाठी ग्रामीण रोजगार निर्मितीतून वाढीव मत्स्योत्पादन घेण्यासाठी संदर्भाधिन शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील काही मुद्दयांना अनुलक्षून काही लोकप्रतिनिधी / मच्छिमार संघटना यांनी सदर धोरणामध्ये सुधारणा करण्याबाबत विविध स्तरावर निवेदने दिली. सदर प्राप्त निवेदनाच्या अनुषंगाने दिनांक २६.६.२०१४ च्या शासन निर्णयास शासन पत्र क्र. मत्स्यवि १२१४/ प्र.क्र. १०१/ पदुम १३, दि. १६.०५.२०१६ अन्वये स्थगिती देण्यात आली. तसेच रिट याचिका क्रमांक ५२२८/२०१५ प्रकरणी मा. उच्च न्यायालय खंडपीठ नागपूर यांनी स्वयंस्पष्ट पारदर्शक धोरण निश्चित करण्याचे निर्देश दिले होते, शासनाकडे प्राप्त झालेली निवेदने या अनुषंगाने तलाव ठेका धोरणात सुधारणा करण्यासाठी शासनाने दिनांक १७.०५.२०१६ च्या आदेशान्वये डॉ. चंद्रप्रकाश मुख्यशास्त्रज्ञ केंद्रीय मत्स्यकी शिक्षण संस्था मुंबई यांचे अध्यक्षतेखाली, समिती नेमली होती. सदर समितीने दिनांक २१ डिसेंबर २०१६ रोजी आपला अहवाल शासनास सादर केला असून, सदर समितीने शासनास एकूण १९ शिफारसी केल्या आहेत. चंद्रप्रकाश समितीच्या शिफारसी तसेच लोकप्रतिनीधी / मच्छिमार संघटना यांची मागणी व रिट याचिका क्र.५२२८/२०१५ मधील निर्देश तसेच मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र. १२५१८/२०१६ प्रकरणी दि. ३०.०६.२०१७ पर्यंत धोरण निश्चित करण्याबाबत दिलेले निर्देश विचारात घेऊन संदर्भाधिन तसेच तलाव ठेक्याशी संबंधित सर्व शासन निर्णय अधिक्रमित करुन तसेच संदर्भ क्रमांक २ अन्वये दिलेली स्थगिती उठविण्यात येऊन राज्यात नविन तलाव ठेका धोरण लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय : -**

शासन या निर्णयाव्दारे पूर्वीचे तलाव ठेका विषयक शासन निर्णय अधिक्रमित करुन खालीलप्रमाणे सुधारित तलाव ठेका धोरण निश्चित करण्यास मान्यता देत आहे. तसेच संदर्भ क्रमांक २ अन्वये दिलेली स्थगिती उठविण्यात येत आहे. मत्स्यव्यवसाय विभागातंर्गत येणाऱ्या जलाशयाचे त्यांच्या जलक्षेत्रानुसार म्हणजे २०० हेक्टर पर्यंत, २००.०१ ते १००० हेक्टरपर्यंत व १०००.०१ हेक्टरवरील याप्रमाणे तीन गट करण्यात आले आहेत. या जलक्षेत्रानुसार जलसंपदा विभागाने

निर्मित केलेल्या व मत्स्यव्यवसाय विभागाकडे मासेमारी हक्क हस्तांतरीत केलेल्या जलाशयामध्ये खालीलप्रमाणे जलाशय/तलावात मासेमारी करण्याकरिता ठेका देण्याबाबत या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय हा आदिवासी क्षेत्रातील अनुसूचित केलेल्या गावांमधील ग्रामपंचायती अंतर्गत येणाऱ्या १०० हेक्टर खालील जलाशय/गांव तलावांमध्ये मासेमारी करण्यासाठी लागू होणार नाही.

३. यापुढे तलाव ठेकेदार म्हणजे तलाव ठेक्याने घेणारी मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था/मत्स्यव्यवसाय सहकारी संघ/मच्छिमार /मत्स्यसंवर्धक/ खाजगी उद्योजक असे समजण्यात यावे.

४. मासेमारी ठेका कालावधी हा १ जुलै ते ३० जून असा गणण्यात यावा व त्यास मत्स्यव्यवसाय वर्ष असे यापुढे संबोधण्यात यावे.

५. तलावाचा/जलाशयाचा ठेका कालावधी हा ५ वर्ष इतका राहील.

६. मासेमारीचे कार्यक्षेत्र हे संबंधित संस्था ज्या तलावावर/जलाशयावर नोंदणी झालेली आहे त्या तलाव/जलाशयापुरते मर्यादित राहिल.

७. ठेका घेण्यापूर्वी संबंधित ठेकेदाराने आपले अद्ययावत लेखा परिक्षण अहवाल (उदाहरणार्थ:- जून २०१७ पर्यंत ठेके निश्चित करताना सन २०१६-१७ चा लेखापरिक्षण अहवाल प्राप्त झाला नसल्यास लगतच्या वर्षाचा म्हणजे सन २०१५-१६ चा लेखापरिक्षण अहवाल) तलाव ठेका समितीस सादर करणे बंधनकारक राहिल. या सर्वाची पडताळणी करुनच तलाव ठेका समितीने पुढील कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

८. मच्छिमार संस्था/मच्छिमार संघ/खाजगी उद्योजक यांनी प्रतिवर्षी लेखापरिक्षण करुन संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांना दरवर्षी ३० जूनपर्यंत लेखापरिक्षण अहवाल सादर करणे बंधनकारक राहील.

९. जलाशय/तलाव ठेका करारनामा करताना संबंधित मच्छिमार संस्था/मच्छिमार संघ/खाजगी उद्योजक यांनी स्थानिक मच्छिमारांना/सभासदांना रोजगार मिळेल अशी अट नमूद आहे याची खात्री करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांची राहिल.

१०. संबंधित ठेकेदाराने मासेमारीबाबत दैनंदिन तपशिल ठेवणे बंधनकारक राहील तसेच मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था/मत्स्यव्यवसाय सहकारी संघ यांनी सभासदांमार्फत केलेल्या मासेमारीबाबत आवश्यक ते सर्व अभिलेख ठेवणे बंधनकारक राहील.

११. जलाशय/तलाव ठेका धोरणातील तरतुदी या महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळाकडे हस्तांतरीत केलेल्या जलाशयासाठी सुध्दा लागु राहतील. तथापि, सदर महामंडळ हे स्वायत्त संस्था असल्याने जलाशय / तलाव यांच्या विकासासाठी आकारण्यात येणारी फक्त ठेका रक्कम त्याच्या धोरणानुसार राबविण्यासाठी मुभा देण्यात येत आहे. महामंडळास खाजगी, सार्वजनिक सहभागाने प्रकल्प राबवयाचा झाल्यास अशा प्रकल्पांना शासनाची पुर्व परवानगी घेणे बंधनकारक राहील.

१२. जलक्षेत्रनिहाय तलाव/जलाशय मासेमारी करण्याकरिता ठेक्याने देणे.

जलक्षेत्राची खालीलप्रमाणे तीन गटात विभागणी करण्यात येत आहे. त्या गटानुसारच तलाव/जलाशय ठेक्याने देण्यात येतील.

(अ) २०० हेक्टर पर्यंत

(ब) २००.०१ हेक्टर ते १००० हेक्टर

(क) १०००.०१ हेक्टर वरील

| अ. क्र. | बाब | जलक्षेत्र २०० हेक्टर पर्यंतचे तलाव | जलक्षेत्र २००.०१ हेक्टर ते १००० हेक्टर पर्यंतचे जलाशय | जलक्षेत्र १०००.०१ हेक्टर वरील जलाशय |
|---|---|---|---|---|
| १ | संस्था नोंदणी मर्यादा | प्रथम १०० हेक्टर जलक्षेत्रापर्यंत १ संस्था २०० हेक्टरपर्यंत जास्तीत जास्त २ संस्था नोंदणी करता येतील.<br>यापुर्वी २ पेक्षा जास्त संस्था नोंदणी झाल्या असल्यास त्यांचे अस्तित्व ग्राहय धरले जाईल. | २०० हेक्टर पर्यंत २ व तदनंतर उर्वरित जलक्षेत्राकरिता प्रत्येकी ४०० हेक्टर जलक्षेत्रा-करीता १ असे एकक निश्चित करुन जास्तीत जास्त ४ प्राथमिक मच्छिमार संस्था नोंदणी करता येतील.<br>यापुर्वी ४ पेक्षा जास्त मच्छिमार सहकारी संस्था नोंदणी झालेल्या असल्यास अशा सर्व संस्थांचे अस्तित्व ग्राहय धरण्यात येईल. | प्रथम १०० हेक्टर जलक्षेत्रापर्यंत १ संस्था व २०० हेक्टर पर्यंत २ व तदनंतर प्रत्येक ४०० हेक्टर जलक्षेत्राकरीता १ असे एकक निश्चित करुन १००० हेक्टरपर्यंत जास्तीत जास्त ४ प्राथमिक मच्छिमार संस्था नोंदता येतील व अशाप्रमाणे ४ संस्था स्थापनेनंतर पुढील सर्व १०००.०१ वरील जलाशयां करीता १००० हेक्टर एकक धरुन पुढील प्राथमिक मच्छिमार संस्था नोंदणी करता येतील.<br>सदर एककानुसार निर्माण होणाऱ्या संस्थेच्या संख्येपेक्षा जास्त संस्था यापुर्वी नोंदणी झालेल्या असल्यास अशा सर्व संस्थांचे अस्तित्व ग्राहय धरण्यात येईल.<br>२००० हेक्टर वरील जलाशया करिता एक भूजलाशयीन संघ स्थापन करता येईल.<br>या प्रकारे नोंदणी झालेला मच्छिमार सहकारी संघ हा सर्व सभासद मच्छिमार सहकारी संस्थामध्ये समन्वय विषयक कार्य करेल. नोंदणी झालेल्या संघाला मासळी सुरक्षण, वाहतूक व पणन तसेच इतर अनुषंगीक बाबींचे कार्य करणे आवश्यक राहील. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | तलाव ठेका देण्याची कार्यपध्दती | (अ) तलावावर केवळ एक संस्था नोंदणी झालेली असल्यास सदर संस्थेस पात्रतेच्या निकषानुसार न्युनतम ठेका रक्कमेने सदर तलावाचा ठेका देण्यात येईल.<br>(ब) मात्र एकापेक्षा अधिक संस्था नोंदणी झाल्या असल्यास त्या संस्थांमध्ये न्यूनतम ठेकापेक्षा अधिकतम बोली रक्कम बोलणा-या मच्छिमार सहकारी संस्थेस लिलाव पध्दतीने (जाहिर बोलीव्दारे) मासेमारी ठेका देण्यात येईल.<br>(क) २०० हेक्टर पर्यंतच्या तलावावर नोंदणी झालेल्या संस्थांनी तलावाचा ठेका न घेतल्यास सदर तलाव जाहिर लिलावाव्दारे संबंधित जिल्हयातील नोंदणीकृत संस्थाना मासेमारीसाठी ठेक्याने देण्यात येईल.<br>ड. सदर तलाव जिल्हयातील कोणत्याही संस्थेने जाहिर लिलावाद्वारे ठेक्याने न घेतल्यास सदर तलाव ठेका जाहिर निविदेने ठेक्याने देण्यात येईल. | (अ) जलाशयावर केवळ एक संस्था नोंदणी झालेली असल्यास सदर जलाशय जाहिर लिलावाव्दारे संबंधित जिल्हयातील नोंदणीकृत संस्थाना मासेमारीसाठी ठेक्याने देण्यात येईल.<br>(ब) मात्र एकापेक्षा अधिक संस्था नोंदणी झाल्या असल्यास त्या संस्थांमध्ये न्यूनतम ठेकापेक्षा अधिकतम बोली रक्कम बोलणा-या मच्छिमार सहकारी संस्थेस लिलाव पध्दतीने (जाहिर बोलीव्दारे) मासेमारी ठेका देण्यात येईल.<br>(क) जलाशयावर नोंदणी झालेल्या संस्थांनी तलावाचा ठेका न घेतल्यास सदर जलाशय जाहिर लिलावाव्दारे संबंधित जिल्हयातील नोंदणीकृत संस्थाना मासेमारीसाठी ठेक्याने देण्यात येईल.<br>ड. सदर जलाशय जिल्हयातील कोणत्याही संस्थेने जाहिर लिलावाद्वारे ठेक्याने न घेतल्यास सदर जलाशय ठेका जाहिर निविदेने ठेक्याने देण्यात येईल. | जलाशयांमध्ये अधिक मत्स्योत्पादनासाठी जास्त प्रमाणात आर्थिक गुंतवणूक व मुलभूत सोईसुविधांची निर्मिती करणे आवश्यक आहे. यापुढे १०००.०१ हेक्टरवरील सर्व जलाशय शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या ई-निविदेच्या कार्यपध्दतीनुसार मच्छिमार सहकारी संस्था/मच्छिमार संघ/ खाजगी व्यक्ती यांना ठेक्याने देण्यात येतील.<br>शास्त्रोक्त पध्दतीने मत्स्योत्पादन घेण्याकरिता १००० हेक्टर व त्यावरील जलाशयामध्ये प्रकल्प राबविताना मत्स्यव्यवसाय पदवी (BFSc) अथवा पदव्युत्तर पदवीधारक(MSc Fisheries /MFSc) तसेच प्राणीशास्त्र पदवीधारक/पदव्युत्तर पदवी अर्हताधारकास सदर प्रकल्पावर व्यवस्थापक म्हणून नेमणे बंधनकारक राहील. |
| ३ | सक्षम कार्यान्वयन तलाव ठेका समिती | जिल्हास्तरीय तलाव ठेका समिती | प्रादेशिकस्तरीय तलाव ठेका समिती | आयुक्त स्तरीय तलाव ठेका समिती |

**१३. <u>जलाशय /तलाव ठेका निर्धारीत रक्कम प्रती वर्ष आकारण्याची पध्दत खालील नमुद केल्या प्रमाणे परिगणना करुन आकारण्यात येईल.</u>**

| अ. क्र. | तलावाचे सरासरी जलक्षेत्र (हेक्टर) | अपेक्षित इष्टतम बोटुकली साठवणुक | अपेक्षित मत्स्योत्पादन (कि.ग्रा.) | आकारवयाची तलावठेका रक्कम ( प्रती वर्ष) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ० ते २० | ५००० प्रति हेक्टर | १५०० प्रति हेक्टर | रु.१८०० प्रति हेक्टर |
| २ | २०.०१ ते ६० | १००००+२० हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी २००० | ३००००+२० हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी ६०० | ३६०००+२० हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी ३६० |
| ३ | ६०.०१ ते २०० | १८००००+६०हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी १००० | ५४०००+६०हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी ३०० | ५०४००+६०हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी १८० |
| ४ | २००.०१ ते १००० | ३२००००+२००हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी ५०० | ९६०००+२००हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी १५० | ७५६००+२००हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी ९० |
| ५ | १०००.०१ ते २००० | ७२००००+१०००हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी ५०० | २१६०००+१०००हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी ७५ | १४७६००+१०००हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी ४५ |
| ६ | २००० वरील | १२०००००+२०००हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी ५०० | २९१०००+२०००हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी ७५ | १९२६००+२०००हेक्टर पुढील प्रत्येक हेक्टरसाठी ४५ |

वरील तक्त्यात नमुद केलेली जलाशय/तलावाच्या ठेका रक्कमेची गणना करण्याकरिता अपेक्षित मत्स्योत्पादनाच्या आधारावर प्रतिकिलो मासळीचा दर सरासरी रु.६०/- ग्राहय धरुन पुढील सुत्रानुसार येणाऱ्या ठेका रक्कम आकारणी करण्यात येईल. सदर ठेका रक्कम आकारणी करण्याकरिता संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय हे सक्षम प्राधिकारी राहतील.

सूत्र -

तलाव ठेका रक्कम (रु).=तलावाचे क्षेत्र(हेक्टर)Xअपेक्षित मत्स्योत्पादन प्रति हेक्टर (किलो) X प्रतिकिलो मासळीचा बाजारभाव (रु.६०/-) X २/१००.

उपरोक्त ठेका रक्कम निश्चित करताना केवळ मत्स्योत्पादनाच्या अनुषंगाने न्यूनतम रक्कमेस तलाव ठेका देण्यात येईल. तथापि, ठेकेदाराने कोळंबी संवर्धन केल्यास त्यास वाढीव उत्पादन मिळत असल्याने ठेकेदारास कोळंबी संवर्धन करावयाचे असल्यास उपरोक्त तक्त्यानुसार येणाऱ्या ठेका रक्कमेत २० टक्के वाढीव रक्कम कोळंबीपोटी ठेका रक्कम म्हणून भरणा करावी लागेल.

## १४. तलाव ठेका समिती

समिती व समितीची कार्यकक्षा

### १४.१ राज्यस्तरीय समिती

| | | |
|---|---|---|
| १. अप्पर मुख्य सचिव (महसूल) | अध्यक्ष | तलाव/जलाशयाच्या निर्मितीनंतर मासेमारी हक्क मत्स्यव्यवसाय विभागाकडे हस्तांतरीत केल्यानंतरही बऱ्याच वेळा स्थानिक प्रशासनामार्फत मासेमारी करण्यास प्रतिबंध करण्यात येतो. यापुढे असे प्रतिबंध होऊ नये यास्तव, राज्यस्तरीय समितीच्या पुर्वपरवानगी शिवाय अशी कार्यवाही करता येणार नाही. |
| २. प्रधान सचिव (वित्त) | सदस्य | |
| ३. प्रधान सचिव (वने)सदस्य | सदस्य | |
| ४. प्रधान सचिव (ग्राम विकास) | सदस्य | |
| ५. प्रधान सचिव (आदिवासी विकास) | सदस्य | |
| ६. प्रधान सचिव (सामाजिक न्याय) | सदस्य | |
| ७. सचिव (जलसंपदा) | सदस्य | |
| ८. सचिव (पदुम) | सदस्य | |
| ९. आयुक्त मत्स्यव्यवसाय | सदस्य सचिव | |

### १४.२ आयुक्तस्तरीय तलाव ठेका समिती

| | | |
|---|---|---|
| १. आयुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई | अध्यक्ष | १) १००० हेक्टरवरील जलाशय ई-निवदा प्रक्रियेद्वारे ठेक्याने देणे.<br>२)१००० हेक्टरवरील जलाशयात अपवादात्मक परिस्थितीत परप्रांतीय मच्छिमारांना मासेमारीस परवानगी देणे व परप्रांतीय मच्छिमारांच्या संख्येची निश्चिती करणे.<br>३) १००० हेक्टरवरील जलाशयाच्या मुदतवाढ तसेच सवलतीबाबत निर्णय घेणे.<br>४) १००० हेक्टरवरील जलाशयाचे ठेके रद्द करणेबाबत निर्णय घेणे. तसेच, काळ्या यादीबाबत निर्णय घेणे.<br>मत्स्योद्योग विकास महामंडळास हस्तांतरीत करण्यात आलेले १००० हेक्टरवरील जलाशयाचे ठेके ई-निविदेद्वारे देणेबाबतची कार्यवाही महामंडळ करेल. |
| २. उपसचिव/सहसचिव (मत्स्यव्यवसाय), (पदुम) मुंबई | सदस्य | |
| ३.उपसचिव/सहसचिव (जलसंपदा) मुंबई | सदस्य | |
| ४. उपसचिव/सहसचिव (वित्त) मुंबई | सदस्य | |
| ५. क्षेत्रिय मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग. | सदस्य | |
| ६.संबंधित प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय | सदस्य | |
| ७. उपनिबंधक (मत्स्य) सहकारी संस्था, मुंबई | सदस्य | |
| ८. सहाय्यक संचालक (लेखा व वित्त) आयुक्त मत्स्यव्यवसाय कार्यालय, | सदस्य | |
| ९. सहआयुक्त मत्स्यव्यवसाय (भूजल), मुंबई | सदस्य | |
| १०. सहाय्यक आयुक्त, मत्स्य (भूजल), आयुक्त कार्यालय, मुंबई. | सदस्य सचिव | |

### १४.३ प्रादेशिक स्तरीय तलाव ठेका समिती

| | | |
|---|---|---|
| १. संबंधित प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय | अध्यक्ष | १) २००.०१ ते १००० हेक्टर पर्यंतचे जलाशय कार्यक्षेत्रानुसार लिलाव पध्दतीने अथवा जाहिर निवदा प्रक्रियेद्वारे ठेक्याने देणे.<br>२) २००.०१ ते १००० हेक्टरपर्यंतचे जलाशयात अपवादात्मक परिस्थितीत परप्रांतीय मच्छिमारांना |
| २. क्षेत्रिय अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग | सदस्य | |
| ३. सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय (संबंधित जिल्हयाचे) | सदस्य | |

| | | |
|---|---|---|
| ४. मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी (प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय कार्यालय ) | सदस्य | मासेमारीस परवानगी देणे व परप्रांतीय मच्छिमारांच्या संख्येची निश्चिती करणे.<br>३) २००.०१ ते १००० हेक्टरपर्यंतचे जलाशयाच्या मुदतवाढ तसेच सवलतीबाबत निर्णय घेणे.<br>४) २००.०१ ते १००० हेक्टरपर्यंतचे जलाशयाचे ठेके रद्द करणेबाबत निर्णय घेणे. तसेच, काळ्या यादीबाबत निर्णय घेणे. |
| ५. सहाय्यक निबंधक (दुग्ध) (संबंधित जिल्हयाचे) | सदस्य | |
| ६. मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी (संबंधित जिल्हयाचे) | सदस्य सचिव | |

## १४.४ जिल्हा स्तरीयतलाव ठेका समिती

| | | |
|---|---|---|
| १. सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय (संबंधित जिल्हयाचे) | अध्यक्ष | १) २०० हेक्टरपर्यंतचे तलाव कार्यक्षेत्रानुसार अथवा लिलाव पध्दतीने अथवा जाहिर निवदा प्रक्रियेद्वारे ठेक्याने देणे.<br>२) २०० हेक्टरपर्यंतचे तलावात अपवादात्मक परिस्थितीत परप्रांतीय मच्छिमारांना मासेमारीस परवानगी देणे व परप्रांतीय मच्छिमारांच्या संख्येची निश्चिती करणे.<br>३) २०० हेक्टरपर्यंतचे तलावाच्यामुदतवाढ तसेच सवलतीबाबत निर्णय घेणे.<br>४) २०० हेक्टरपर्यंतचे तलावाचे तलाव ठेके रद्द करणेबाबत निर्णय घेणे. तसेच, काळ्या यादीबाबत निर्णय घेणे. |
| २. क्षेत्रिय कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग | सदस्य | |
| ३. सहाय्यक निबंधक (दुग्ध) | सदस्य | |
| ४.मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी | सदस्य | |
| ५. अध्यक्ष, संबंधित जिल्हा मत्स्य संघ | सदस्य | |
| ६. सहाय्यक मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी | सदस्य सचिव | |

सर्व तलाव ठेका समित्यांनी तलाव ठेका देण्याची कार्यवाही १ जुलै पुर्वी पुर्ण होईल याची दक्षता घ्यावी. काही परिहार्य कारणाने अथवा प्रशासकीय कारणाने ठेका देण्यास विलंब होत असल्यास यासाठी प्रचलीत पध्दती नुसार तात्पुरते मासेमारी परवाने देऊन अशा तलावात मत्स्योत्पादन घेण्यात यावे.

## १५ तलाव/जलाशय जाहिर निविदेने ठेकयाने देण्याची प्रक्रिया.

### १५.१ जलाशय/तलाव ठेका देताना, ठेकेदार/संस्था/संघ/खाजगी व्यक्ती यांच्या पात्रतेचे निकष खालीलप्रमाणे राहतील.

अ) संस्था ही भुजलाशयीन मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था म्हणून नोंदणी झालेली असावी.

ब) संस्था/संघ तलाव ठेक्याने देण्याच्या वेळी बंद अथवा अवसायनात नसावे.

क) संस्था/संघ/खाजगी ठेकेदार मत्स्यव्यवसाय विभागाचे कसल्याही प्रकारचे थकबाकीदार नसावे.

ड) मच्छिमार संस्था/मच्छिमार संघ यांनी अद्ययावत लेखापरिक्षण अहवाल सादर करणे बंधनकारक आहे.तसेच खाजगी व्यक्ती/ठेकेदार यांनी गत तीन वर्षाचे आयकर विवरणपत्र सादर करणे बंधनकारक आहे.

इ) तलाव ठेका रक्कम व तलाव ठेका अनामत रक्कम अशी मिळून होणारी एकत्रित रक्कम ही संस्थेच्या/संघ/ठेकेदाराच्या बँक खात्यात जमा असावी व असे बँकेचे दस्तऐवज सादर करणे बंधनकारक राहिल.

फ) एखादी नियोजित संस्था अर्जदार असेल तर अशा संस्थांची मागणी विचारात घेण्यांत येणार नाही.

**१५.२.** १०००.०१ वरील जलाशयात मुद्दा क्र.१५.१ ची कागदपत्रे ही ई-निविदेतील कागदपत्रांचा भाग राहतील मात्र प्रथम तांत्रिक ई-निविदा पात्र ठरल्याशिवाय वाणिज्यिक ई-निविदा उघडण्यात येणार नाही. ई-निविदा प्रक्रियेस खालील मुद्दा क्र. १५.२.१ ते १५.२.३ च्या अटी शर्ती तसेच खालील सर्व अटीशर्ती बंधनकारक राहतील. १००० हेक्टर जलाशयापर्यंत तलाव/जलाशय याची निविदा भरण्याची पध्दत खालीलप्रमाणे असेल,

**१५.२.१ निविदाधारक संस्था असल्यास**

(अ) संस्था नोंदणी प्रमाणपत्र

(ब) गत तीन वर्षाचे लेखापरिक्षण व ताळेबंद (सनदी अथवा प्रमाणित लेखापालाकडून प्रमाणित).

(क) संस्थेचे लेखापरिक्षण वर्ग "अ" अथवा "ब"असणे आवश्यक आहे मात्र २०० हेक्टर पर्यंतच्या तलावांच्या निविदाप्रकरणी लेखापरिक्षण वर्ग हा किमान "क" वर्ग असावा.

(ड) संस्था अवसायनात अथवा बंद करणेबाबत कोणतीही कार्यवाही सुरु नसावी.

(ई) संस्था मत्स्यव्यवसाय विभागाची थकबाकीदार नसावी.

(फ) तलाव/जलाशयाची ठेका रक्कम व अनामत रक्कम संस्थेच्या बँक खात्यावर जमा असणे बंधनकारक आहे.

**१५.२.२ निविदाधारक खाजगी व्यक्ती असल्यास**

(अ) गत तीन वर्षाचे आयकर भरणाबाबत विवरणपत्र सादर करणे बंधनकारक आहे.

(ब) जलाशयाची ठेका रक्कम व अनामत रक्कम बँक खात्यावर जमा असणे बंधनकारक आहे.

(क) महाराष्ट्रात किमान १० वर्ष वास्तव्य असणे बंधनकारक आहे.

(ड) अनुभव असल्यास अनुभव प्रमाणपत्र

**१५.२.३ निविदाधारक कंपनी/फर्म असल्यास**

(अ) नोंदणी प्रमाणपत्र

(ब) गत तीन वर्षाचे लेखापरिक्षण व ताळेबंध (सनदी अथवा प्रमाणित लेखापालाकडून प्रमाणित).

(क) जलाशयाची ठेका रक्कम व अनामत रक्कम बँक खात्यावर जमा असणे बंधनकारक आहे.

(ड) अनुभव असल्यास त्याबाबतचे प्रमाणपत्र.

(इ) आयकर भरणाबाबत विवरणपत्र/प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक आहे.

**१५.३** संस्थेच्या प्रत्येक सभासदाने त्याचे बँकेत खाते उघडलेले असणे बंधनकारक आहे अशा खात्यास आधारकार्ड जोडणी आवश्यक आहे व याची यादी संबंधित सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांना दरवर्षी सादर करणे बंधनकारक आहे.

खाजगी ठेकेदाराने तलाव ठेका घेतल्यानंतर मासेमारी करणाऱ्या सर्व सभासदांची यादी आधारकार्ड जोडणी केलेल्या बँक खात्याच्या तपशीलासह सादर करावी.

**तलावात/जलाशयात मासेमारी करणारे मच्छिमार/ सभासद/ व्यक्ती यांना देय असलेला मोबदला (मराई इ.) हा रोखीने न देता थेट बँक खात्यात (संयुक्त खाते-मच्छिमार व त्याची पत्नी) डी.बी.टी. व्दारे वर्ग करण्यात यावा.**

**१५.४** जाहिर निविदा **"टु बीड"** पध्दतीने म्हणजेदोन लिफाफा पध्दतीची राहील.

**१५.५** लिफाफा **"अ"** हा तांत्रिक व लिफाफा **"ब"** हा वाणिज्यिक लिफाफा राहील व सदर दोन्ही लिफाफे सिलबंद करुन एका मोठया लिफाफ्यात भरुन हा मोठा लिफाफा सिलबंद करुन निविदा म्हणून सादर केले जातील.

**१५.६** वरील सर्व कागदपत्रे ही लिफाफा "अ" म्हणजेच तांत्रिक निविदेचा भाग राहतील

**१५.७** संबंधित तलाव ठेका समिती समोर लिफाफा "अ" हा प्रथम उघडण्यात येईल व तांत्रिकदृष्टया निविदा पात्र ठरल्यानंतरच वाणिज्यिक लिफाफा "ब" उघडण्यात येईल.

**१५.८** प्रथम उच्चतम देकार सादर करणाऱ्या निविदाधारकास तलावाचा ठेका देण्यात यावा.

**१५.९** सदर उच्चतम निविदा धारकाने निविदा मंजुर झाल्याचे आदेश प्राप्त झाल्यापासुन आठ दिवसाच्या आत ठेका रक्कम व अनामत रक्कम भरणा करणे बंधनकारक राहील.

**१५.१०** सदर ठेका व अनामत रक्कम उच्चतम निविदाधारकाने विहित मुदतीत भरणा न केल्यास त्याची निविदा रद्द करुन त्याची बयाना रक्कम शासन जमा करण्यात येईल व त्यांना ६ वर्षाकरीता काळया यादीत टाकण्यात येईल.

**१५.११** तदनंतर द्वितीय उच्चतम निविदाधारक जर प्रथम उच्चतम निविदा देकाराऐवढी रक्कम भरणा करण्यास तयार असल्यास त्याला जलाशयाचा ठेका देण्यात येईल व त्यांनी ठेका रक्कम व अनामत रक्कम निविदा मंजुर झाल्याचे आदेश प्राप्त झाल्यापासुन आठ दिवसाच्या आत भरणा करणे बंधनकारक राहील.

**१५.१२** उच्चतम निविदाधारक अथवा द्वितीय उच्चतम निविदाधारक यांनी उपरोक्त नुसार ठेका रक्कम व अनामत रक्कम भरणा न केल्यास नव्याने निविदा काढण्यात येतील.

**१५.१३** तलाव/जलाशय जाहिर निविदेद्वारे ठेक्याने देण्यासाठी किमान तीन पात्र निविदा असणे बंधनकारक आहे.

**१५.१४** तलाव/जलाशयाकरीता एका वर्षात कमाल तीन वेळा निविदा मागविण्यात येतील तरीही प्रतिसाद न मिळाल्यास सदर तलाव/जलाशयावर इच्छूक मच्छिमारांना मासेमारीकरिता मत्स्यव्यवसाय विभागामार्फत विहित पध्दतीने व शासकीय दराने मासेमारी परवाना अदा करण्यात येतील.

**१५.१५** पुढील वर्षी ठेका रक्कम भरण्यासाठी ३० एप्रिल हा अंतिम दिनांक राहिल. या अंतिम दिनांकापर्यंत पुढील वर्षाची ठेका रक्कम न भरल्यास तलाव ठेका रक्कम ३० जून पर्यंत सरासरी १५% व्याज व ५% दंड याप्रमाणे दंड व व्याज भरणा करुन घेण्यात येईल. त्यानंतर आलेली तलाव ठेका रक्कम कोणत्याही परिस्थितीत स्विकारली जाणार नाही व संबंधित तलाव ठेका समिती सक्षम प्राधिकाऱ्याच्या मंजूरीने ठेका रद्द करण्याची कार्यवाही करेल.

१६. संबंधित तलाव/जलाशय ठेकेदाराने त्या जलाशयावर नोंदणी झालेल्या इतर अन्य संस्थेच्या सभासदांना, व स्थानिक मच्छिमारांना मासेमारी करु देणे बंधनकारक राहिल. याबाबत प्रश्न उद्भवल्यास त्याचे निराकरण संबंधित सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी करावे. तलाव/ जलाशयातील मत्स्योत्पादनाची मालकी ही संबंधित तलाव ठेकेदाराची असेल. यासाठी मच्छिमाराने पकडलेली मासळी (मासे,कोळंबी ई.) हे ठेकेदारास देणे बंधनकारक राहील. स्थानिक मच्छिमारांना / सभासदांना रोजगार मिळेल याची खात्री करणे याची जबाबदारी संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांची राहील. तसेच, ठेकेदाराने २०० हे. जलक्षेत्रापर्यंत १०० किलो व तद्नंतरचे क्षेत्रासाठी प्रति जलाशय २०० किलो जीवंत प्रजनक साठा विभागास विनामुल्य उपलब्ध करून द्यावा.

१७. मत्स्यबोटुकली/कोळंबी बीज संचयनासाठी जलाशय/तलावांमध्ये योग्य प्रकारे संचयन करण्यात येत असल्याची खात्री करण्याची जबाबदारी संबंधित सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांची राहील. ठेका कालावधी संबंधित ठेकेदार मत्स्यबोटुकली संचयन आवश्यक प्रमाणात करीत नसेल किंवा मत्स्योत्पादनाचे अहवाल नियमितपणे संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय कार्यालयास सादर करत नसतील तसेच तलाव ठेका करारपत्राचा भंग केल्याचे आढळून आल्यास असा ठेका रद्द करण्याचे अधिकार संबंधित तलाव ठेका समितीस राहतील व अशा संबंधित ठेकेदारास पुढील ६ वर्षाकरीता काळया यादीत टाकण्यात येईल.

१८. विहित करारपत्र करुन देणे संबंधित ठेकेदार यांना बंधनकारक राहील. असा करारनाम्याचा मसुदा आयुक्त कार्यालयाने शासनाच्या धोरणानुसार निश्चित करुन जिल्हा कार्यालयास दयावा. मच्छिमार संस्था/मच्छिमार संघ/खाजगी ठेकेदार यांना रु.२००/- व शासन वेळोवेळी ठरविल त्या मुद्रांक शुल्काच्या स्टॅम्प पेपरवर करारपत्र करणे बंधनकारक राहिल. तसेच मच्छिमारसंस्था /मच्छिमार संघ/खाजगी ठेकेदार यांनी प्रतिवर्षी लेखापरिक्षण करून संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांना दरवर्षी ३० जून पर्यंत लेखापरिक्षण अहवाल सादर करणे बंधनकारक राहील. (उदाहरणार्थ:- जून २०१७ पर्यंत ठेके निश्चित करताना सन २०१६-१७ चा लेखापरिक्षण अहवाल प्राप्त झाला नसल्यास लगतच्या वर्षाचा म्हणजे सन २०१५-१६ चा लेखापरिक्षण अहवाल)

१९. जलाशय/तलावठेका अनामत रक्कम ही निर्धारित केलेल्या जलाशय/तलाव ठेका रक्कमेच्या अथवा निविदेद्वारे निश्चित केलेल्या ठेका रक्कमेच्या ५०% किंवा कमीत कमी पंधरा हजार यापैकी जी अधिक असेल ती राहील. सुरक्षा अनामत रकमेचा भरणा रोख दर्शनी हुंडीद्वारेकरावा.

२०. तलाव ठेकेदार मच्छिमार संस्था/मच्छिमार संघ/खाजगी ठेकेदार यांनी केलेल्या तलाव ठेका करारपत्रातील अटी शर्ती त्यांना बंधनकारक राहतील.

२१. मच्छिमार संस्थेने/ठेकेदाराने त्यांचेकडील तलाव/जलाशय अन्य कोणासही उपठेक्याने दिला तर सदर तलावाचा/जलाशयाचा ठेका मुदतीपुर्व रद्द करण्यात येईल व त्यांना पुढील सहा वर्षाकरिता काळया यादीत टाकण्यात येईल असे अधिकार संबंधित तलाव ठेका समितीस राहतील.

२२. तलाव/जलाशय प्रकरणी ठेका प्रक्रिया पार पाडण्यास संस्था/निविदाधारक यांनी काही अडथळा निर्माण केल्यास अथवा निविदेच्या/तसेच तलाव ठेका करारपत्राच्या अटी शर्तीचे भंग केल्यास सदर संस्था/खाजगी ठेकेधारक यांना पुढील सहा वर्षाकरिता काळया यादीत टाकण्यात येईल.

२३. ठेका कालावधी मध्ये जलाशय/तलावामध्ये इष्टतम मत्स्यबोटुकली संचयन करणे बंधनकारक राहील. इष्टतम मत्स्यबोटुकली संचयन न केल्यास सक्षम तलाव ठेका समिती असा ठेका रद्द करेल. संचयन केलेली मत्स्यबोटुकलीची आकडेवारी व त्यापासून निर्धारित केलेल्या अपेक्षित मत्स्य उत्पादन व उत्पादीत मासळीची विक्री व्यवहार याचा ताळमेळ असणे आवश्यक आहे. मत्स्य बोटुकली/कोळंबी बीज संचयनासाठी जलाशय/तलावामध्ये योग्य प्रकारे संचयन करण्यात येत असल्याची खात्री करण्याची जबाबदारी संबंधित सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांची राहिल.

**२४. निविदा प्रक्रीयामध्ये अनुज्ञेय प्राधान्य खालील प्रमाणे राहतील.-**

जलाशयाच्या निविदे प्रक्रियेत स्थानिक मच्छिमार संस्था,प्रकल्पग्रस्त पारंपारिक मच्छिमार व इतर मच्छिमार संस्था तसेच मत्स्यविज्ञान पदवीधारक यांना खालील प्रमाणे प्राधान्यक्रम व सवलत राहील.स्थानिक आदिवासी मच्छिमार संस्था/प्रकल्पग्रस्ताची संस्था यांनी खुल्या निविदे प्रक्रियेमध्ये भाग घेतल्यास निविदेप्रक्रियेमध्ये जर खाजगी ठेकेदाराची निविदा रक्कम उच्चतम ठरल्यास सदर संस्थेस अशा उच्चतम निविदा रक्कमेच्या ५% सवलत राहील व त्यांना निविदा प्रक्रियेमध्ये अनुक्रमे प्रथम प्राधान्य राहील.

**२५. जलाशय/तलाव ठेक्यामध्ये अनुज्ञेय असलेल्या सवलती.**

**२५.१** २०० हेक्टर वरील जलक्षेत्र असलेला जलाशय ठेक्याने घेतलेल्या अपेक्षित मत्स्य उत्पादनापेक्षा एका वर्षात २५% जास्त वाढ झाली तर पुढील वर्षाच्या ठेका रक्कमेत ५% सुट देण्यात येईल. अशी सवलत ५ वर्षाच्या कालावधीत फक्त एकाच वर्षासाठी देय राहील. सदर सवलत खाजगी ठेकेदारासही लागू राहील. अशा प्रकारे सवलत देण्याकरिता संबंधित तलाव ठेका समिती आवश्यक कागदपत्रांसह प्रस्तावाची छाननी करुन प्रस्तावास मंजुरी देईल.

**२५.२** अनुक्रमांक २५.१ नुसार सवलत घेण्यासाठी खालील अटी बंधनकारक राहतील.

(अ) मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था/मच्छिमार संघ/खाजगी उद्योजक यांनी इष्टतम बोटुकलीचे संचयन हे करणे बंधनकारक राहील.

(ब) सदर इष्टतम बोटुकलीचे संचयन हे संबंधित ठेकेदाराने मानकानुसार संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय अथवा त्यांचे प्रतिनिधी यांचे समक्ष करावे. विभागाचा प्रतिनिधी उपलब्ध नसल्यास संबंधित तलाव / जलाशयच्या परिसरातील सरपंच / उप सरपंच/ पोलिस पाटील अथवा शासकीय / निमशासकीय कार्यालयातील प्रतिनिधी यांचे समक्ष सदर संचयनाचा संबंधित ठेकेदाराने पंचनामा करणे बंधनकारक राहील.

(क) मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था/मच्छिमार संघ/खाजगी उद्योजक यांनी तलावात दररोज होणाऱ्या मासेमारीची नोंद नोंदवहीत ठेवणे बंधनकारक राहील.

(ड) सदर नोंदी करुन दर महिन्याला ५ तारखेच्या आत मत्स्योत्पादनाचा मासिक अहवाल संबंधित सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांना सादर करणे बंधनकारक राहिल.

(इ) सदर सवलत मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था/मच्छिमार संघ/खाजगी उद्योजक यांना देताना तलावातील संचयन, मत्स्योत्पादन इत्यादी नोंदी मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था/मच्छिमार संघ/खाजगी उद्योजक यांच्या अभिलेखी/आर्थिक व्यवहारात निर्देशित असणे बंधनकारक आहे.

(फ) मत्स्यव्यवसाय विभागामार्फत सर्व तलाव क्षेत्रातील मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था/मच्छिमार संघ/खाजगी उद्योजक यांना त्यांनी ठेक्याने घेतलेल्या तलाव/जलाशयामध्ये केलेले इष्टतम बोटुकली संचयन व मत्स्योत्पादनाबाबतची माहिती मत्स्यव्यवसाय विभागामार्फत स्थानिक सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांच्या कार्यालयास उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

## २६. तलाव ठेका मुदतवाढः-

मत्स्यव्यवसायाकरिता तलाव ठेक्याने दिलेल्या कालावधीत खालीलप्रमाणे विविध कारणास्तव मुदतवाढ देण्यात येईल.

### २६.१ अवर्षणामुळे मुदतवाढः-

तलाव / जलाशय तलावात कॅनलच्या खाली पाणी अडीच मिटरपेक्षा खाली खोल गेले तर आवर्षण मानले जाते. कॅनलच्या खाली पाणी तलावात शिल्लक असते. त्यात मृत पाणी साठा (Dead water stock) असतो. ते मासे जिवंत राहण्यास प्रभावी असते. जर पाण्याची पातळी कॅनल लेवलच्या खाली अडीच मिटरपेक्षा खाली खोल गेली असेल तेव्हा तलाव सुकला आहे असे गृहित धरुन तलाव आवर्षणग्रस्त ठरविण्यात येईल. सध्यस्थितीत तलाव/जलाशयातील पाण्याची पातळी मृतसाठयापेक्षा  अवर्षण झाल्यास तलाव ठेकेदारास विहित तलाव ठेका मुदत पाच वर्षानंतर एक वर्षाची मुदतवाढ देण्यात येते. तथापि बदलत्या व अनिश्चित हवामानामुळे अशी अवर्षणाची परिस्थिती वारंवार उद्भवते. यामुळे प्रदिर्घ परिस्थितीत तलाव ठेकेदाराचे अतिरिक्त नुकसान टाळण्याकरिता आवर्षणाच्या मुदतीत सलग जास्तीत जास्त ३ वर्ष मुदतवाढ देण्यात येईल. अशी मुदतवाढ देण्याकरिता संबंधित तलाव ठेका समिती सक्षम राहिल.

### अटी शर्ती व कार्यपध्दती-

(अ) ज्यावर्षी १ जानेवारी पुर्वी तलावाची पातळी तलावाच्या कॅनलच्या पाणी पातळीपेक्षा म्हणजेच मृत साठयापेक्षा  २.५ मीटर खाली खोल जाईल असा तलाव/जलाशय मत्स्योत्पादनाच्या दृष्टीकोनातून अवर्षणग्रस्त असेल.

(ब) पाणी पातळीचे प्रमाणपात्र ज्या विभागाचा तलाव/जलाशयाची मालकी आहे अशा संबंधित विभाग जसे पाठबंधारे विभाग/जलसंपदा/जलसंधारण इत्यादि विभागाचे कार्यकारी अभियंता यांचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित ठेकेदाराची असेल.

(क) आवर्षणग्रस्त तलावाचे/जलाशयाचे सर्वेक्षण सहाय्यक आयुक्त कार्यालयामार्फत करण्यात येऊन पाणी पातळी प्रमाणपत्र, सर्वेक्षण अहवाल यासह प्रस्ताव संबंधित तलाव ठेका समितीस सादर करण्याची जबाबदारी जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त कार्यालयाची असेल. सदर कार्यवाही १ जानेवारी पुर्वी पुर्ण करावी.

(ड) जर मुदतवाढीच्या पुढील वर्षात पुन्हा अवर्षण झाल्यास पुनश्च वरीलप्रमाणे कार्यवाही करावी अशी मुदतवाढ जास्तीत जास्त सलग तीन वर्षे देण्यात यावी.

(इ) ठेका मुदतवाढ मागणी करणारे तलाव ठेकेदार/संस्था मत्स्य विभागाची थकबाकीदार नसावी.

## २६.२ अतिवृष्टीमुळे मुदतवाढ

तलावाच्या सांडव्यावरुन सलग १२ तासा करीता ६० से.मी. पाणी वाहल्यास अतिवृष्टीग्रस्त म्हणून १ वर्षाची ठेका माफी तलाव ठेका मुदतीच्या ५ वर्षा नंतर देण्यात येते. तथापी बदलत्या हवामानामुळे अतिवृष्टीची परिस्थिती वारंवार उदभवू शकते. याकरिता वस्तूनिष्ठ तलाव ठेका मुदतवाढ देण्याकरीता अतिवृष्टीच्या परिस्थितीनुसार जेवढे वर्ष अतिवृष्टी होईल तेवढी वर्ष अतिवृष्टीच्या लगतच्या वर्षात जास्तीत जास्त ३ वर्ष मुदतवाढ देण्यात येईल. अशी मुदतवाढ देण्याकरिता संबंधित तलाव ठेका समिती सक्षम राहिल.

### अटी शर्ती व कार्यपध्दती

(अ) तलावाच्या/जलाशयाच्या सांडव्यावरुन/भिंतीवरुन सलग बारा तासांकरिता ६० से.मि.पाणी वाहिल्यास असा तलाव/जलाशय मत्स्यव्यवसायाच्या दृष्टीकोणातून अतिवृष्टीग्रस्त असेल.

(ब) पाणी पातळीचे प्रमाणपात्र ज्या विभागाचा तलाव/जलाशयाची मालकी आहे अशा संबंधित विभाग जसे पाठबंधारे विभाग/जलसंपदा/जलसंधारण इत्यादि विभागामार्फत प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित ठेकेदाराची असेल.

(क) अतिवृष्टीग्रस्त तलावाचे/जलाशयाचे सर्वेक्षण सहाय्यक आयुक्त कार्यालयामार्फत करण्यात येऊन पाणी पातळी प्रमाणपत्र, सर्वेक्षण अहवाल यासह प्रस्ताव संबंधित तलाव ठेका समितीस सादर करण्याची जबाबदारी जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त कार्यालयाची असेल. सदर कार्यवाही १ जानेवारी पुर्वी पुर्ण करावी.

(ड) जर मुदतवाढीच्या वर्षात पुन्हा अतिवृष्टी उदभवल्यास पुनश्च वरीलप्रमाणे कार्यवाही करावी. अशी मुदतवाढ जास्तीत जास्त सलग ३ वर्ष देण्यात यावी.

(इ) ठेका मुदतवाढ मागणी करणारे तलाव ठेकेदार/संस्था मत्स्य विभागाची थकबाकीदार नसावेत.

## २६.३ भांडवली गुंतवणूक केल्यास मुदतवाढ

तलावाचा/जलाशयाचा ठेका कालावधी हा ५ वर्ष राहिल परंतू ठेका कालावधी, तलाव ठेकेदार/संस्थेने स्वखर्चाने भांडवली गुंतवणूक केल्यास त्यांना पुढील ५ वर्षाकरिता ठेका मुदतवाढ देण्यात येईल. अशी मुदतवाढ जास्तीत जास्त १५ वर्ष देय राहिल. तलावाच्या/जलाशयाच्या मुदतवाढीकरिता खालील बाबींवर बाबनिहाय भांडवली गुंतवणूकीची टक्केवारी असेल.

**प्रथम मुदतवाढ**

| अ.क्र. | बाब | बाबनिहाय गुंतवणूकीची टक्केवारी |
|---|---|---|
| १ | स्थानिक परिस्थितीनुसार मत्स्यबीज केंद्र/ लघू मत्स्यबीज उत्पादन केंद्र (mini hatchery)/मत्स्यबीज संगोपन तलाव खोदकाम/मत्स्यबीज संगोपन निविष्ठा खर्च/बंदिस्त पिंजरा संवर्धन | ६०% |
| २ | मासे संकलन केंद्र (Shade) व मासेमारीसाठी निवासी शेड | १०% |
| ३. | जाळे खरेदी/शितपेटया/आईस क्रशार/डिप फ्रिजर/नौका खरेदी/ मत्स्यबीज | ३०% |

**द्वितीय मुदतवाढ**

| अ.क्र. | बाब | मुदतवाढ कालावधी | बाबनिहाय गुंतवणूकीची टक्केवारी |
|---|---|---|---|
| १. | जाळे खरेदी/शितपेटया/आईस क्रशार/ डिप फ्रिजर/नौका खरेदी/ मत्स्यबीज संगोपन निविष्ठा खर्च | तलाव ठेका मुदत संपल्यानंतर प्रथम मुदतवाढीकरिता तसेच प्रथम मुदतवाढ संपल्यानंतर दुसऱ्या मुदतवाढीकरिता. | ३०% |
| २. | मासळी वाहतूकीसाठी फिरते मासळी विक्रीकरीता वाहन खरेदी, किरकोळ मासळी विक्रीच्या केंद्राचे आधुनिकीकरण,बर्फकारखाना, शितगृह/ बंदिस्त पिंजरा संवर्धन | तलाव ठेका मुदत संपल्यानंतर व त्यानंतर मिळालेली प्रथम मुदतवाढ संपल्यानंतर दुसऱ्या मुदतवाढी करिता. | ७०% |

**२६.३.१** जलसंपदा विभागाने जलक्षेत्राकरीता भुसंपादीत केलेल्या जमिनी पैकी जी जमीन जलग्रहण क्षेत्राच्या बाहेर राहते, अशा संपादीत केलेल्या जमिनीवर बर्फ कारखाना, शितगृह, मासळी खरेदी-विक्री केंद्र, मत्स्यबीज केंद्र, मत्स्यसंवर्धन तळी इ. मुलभुत सुविधा उभारण्यासाठी अशी जमीन आवश्यक असल्यास ती जलसंपदा विभागाने संबधित जिल्हाधिकारी यांचेकडे वर्ग करावी. जलाशय मासेमारी करीता ठेक्याने देण्यात आलेल्या मच्छिमार संस्था/ मच्छीमारसंघ /खाजगी उद्योजक यांनी मुलभुत सुविधा उभारण्यासाठी अशा जमिनीची मागणी केल्यास सदरची जमीन संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडून मत्स्यव्यवसाय विभागाकडे भाडेपट्टी करारावर उपलब्ध करुन घ्यावी. जलाशय ठेकेदाराने मुलभुत सुविधा उभारण्यासाठी बिगर शेती परवाना मिळण्याबाबत मत्स्यव्यवसाय विभागाकडे विनंती केल्यास संबधित जिल्हाधिकारी यांच्याकडुन मत्स्यव्यवसाय विभागाच्या नावे बिगर शेती परवाना उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करावी व याप्रमाणे उपलब्ध झालेल्या जमिनीबाबत मत्स्यव्यवसाय विभाग व संबधित जलाशया वरिल ठेकेधारक यांच्यामध्ये करार करुन जमिन मुलभुत सुविधा उभारण्यासाठी उपलब्ध करुन घ्यावी.

**२६.३.२** मच्छीमारसंस्था/मच्छीमार संघ/खाजगी ठेकेदार यांनी जलाशयाच्या ठेका कालावधीमध्ये शासकीय अनुदानातून उभारलेल्या मुलभुत सुविधांची मालकी, ठेका कालावधी समाप्ती नंतर मत्स्यव्यवसाय विभागाची राहील व अशा उभारण्यात आलेल्या मुलभुत सुविधा या चांगल्या व कार्यान्वीत स्थितीत मत्स्यव्यवसाय विभागाकडे हस्तांतरीत करणे बंधनकारक राहील. तथापि, निर्माणाधिन जलक्षेत्रामध्ये किनाऱ्यावर मासळी उतरविण्यासाठी, बंदिस्त पिंजऱ्यातील मत्स्यसंवर्धन इ. मुलभुत सुविधा निर्माण करावयाच्या झाल्यास त्याकरिता आवश्यक असलेले ना-हरकत प्रमाणपत्र किंवा परवानगी संबंधित कार्यालयाकडून प्राप्त करून घेण्याची जबाबदारीही संबंधित मच्छीमार संस्था / मच्छीमार संघ / खाजगी ठेकेदार यांची राहील.

**२६.३.३** **भांडवली** गुंतवणूकीसह ठेकेदार यांना जलाशयात क्षमतेनुसार मत्स्य बोटुकली संचयन करणे व अपेक्षित मत्स्योत्पादन साध्य करणे आवश्यक राहील. ठेकेदार हे मुलभूत सुविधा निर्माण करण्याकरिता शासनाच्या विविध योजनांचा लाभ नियमानुसार घेण्यास पात्र असतील. अशा निर्मित मुलभूत सुविधांचा लाभ प्राधान्याने मत्स्योत्पादनासाठी करुन घेणे बंधनकारक राहील. ठेकेदाराने भांडवली गुंतवणूक वार्षिक संचयन, मत्स्योत्पादन उपलब्ध करुन दिलेला रोजगार याचा स्वतंत्र तपशिल ठेवणे बंधनकारक राहिल.

**२६.३.४** सदर गुंतवणूकीची टक्केवारी सर्व तलाव/जलाशयांकरिता लागू राहिल. भांडवली गुंतवणूकीचे प्रमाण तलाव/जलाशयाच्या जलक्षेत्रनिहाय खालीलप्रमाणे राहिल.

| **अ.क्र.** | **जलक्षेत्र** | **तलाव ठेका मुदतीत किमान गुंतवणूकीचे प्रमाण** |
|---|---|---|
| १ | २०० हेक्टर पर्यंत | रु.१५.०० लाख |
| २ | २०० ते १००० हेक्टर | रु.३०.०० लाख |
| ३ | १००० ते २००० हेक्टर | रु.५०.०० लाख |
| ४ | २००० हेक्टरवरील | रु.७५.०० लाख |

**२६.३.५** ठेका मुदतवाढ ही प्रत्यक्ष झालेल्या खर्चानुसार देण्यात येईल. खर्चाच्यातपशिलासह तलाव ठेका मुदतवाढ प्रस्ताव संबंधित तलाव ठेका समितीस सादर करण्याचीजबाबदारी जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त कार्यालयाची असेल. सदर कार्यवाही तलाव ठेका मुदतीच्या अंतिम वर्षातील १ एप्रिल पुर्वी पुर्ण करणे आवश्यक राहिल. अशी मुदतवाढ मागणी संबंधित ठेकेदाराने किमान चार महिने अगोदर देणे आवश्यक राहील.

**२६.३.६** सदरहु तलाव ठेका धोरण लागू होण्यापुर्वी जे जलाशय तलाव ठेक्याने देण्यात आलेले आहेत वत्यांच्या कालावधी या शासन निर्णयाच्या तारखेपासून २ वर्ष अधिक शिल्लक अशा तलाव ठेकेदार यांनी उपरोक्त निश्चित केलेल्या बाबींवर भांडवली गुंतवणूक केल्याचे सिध्द केल्यास असे ठेकेदार नव्या धोरणाप्रमाणे लाभ घेण्यास पात्र राहतील. अशी मुदतवाढ जास्तीत जास्त १५ वर्ष देय राहील. ज्या तलाव/जलाशयाचा ठेका आजपासून २ वर्षापेक्षा कमी कालावधी शिल्लक आहे अशा सर्व तलावांचा ठेका कालावधी संपुष्ठात आल्यानंतर सुधारीतधोरणाप्रमाणे ठेका प्रक्रियेची कार्यवाही करण्यात येईल.

**२६.३.७** तलाव/जलाशयाचा ठेका कालावधी पुढील मुदतवाढ देताना मागील ५ वर्षाकरीता निश्चित केलेल्या ठेका रकमेमध्ये २०% वाढ करुन देण्यात येईल.

२६.४ तलाव ठेकेदारास ठेका देण्यास अपरिहार्य कारणास्तव विलंब झाल्यास देण्याची ठेका मुदतवाढ

शासन निर्णयानुसार तलाव ठेकेदारास मासेमारी करण्याकरिता ५ वर्षाचा कालावधी मिळणे आवश्यक आहे. तलाव ठेक्याने देण्याची कार्यवाही दिनांक १ जुलैपुर्वी पुर्ण होणे अपेक्षित आहे. परंतू अपरिहार्य कारणास्तव प्रथम वर्षाचा ठेका मिळण्यास तीन महिने किंवा त्यापेक्षा जास्त उशिर झाल्यास ठेका कालावधी ५ वर्षापेक्षा कमी होत असल्यास तेवढा कालावधी वाढवून देण्यात यावा व पाच वर्षाचा कालावधी ज्या तारखेस पुर्ण होईल त्या तारखेपासून दिनांक ३० जून पर्यंतच्या उर्वरित कालावधीसाठी त्या प्रमाणात वार्षिक ठेका आकारण्यात येईल. प्रथम वर्षीचा ठेका मिळण्यास उशिर होऊन ३ महिने किंवा त्यापेक्षा कमी कालावधी वाया गेल्यास तेवढया कालावधीची रक्कम पाचव्या वर्षाच्या ठेका रक्कमेतून कमी करण्यात यावी व तलाव ठेक्याची विहित मुदतीत कालावधी पुर्ण होऊन त्या तारखेस ठेका संपुष्टात येईल.

**२७. जलाशय/तलाव यांच्या ठेका रक्कमेद्वारे प्राप्त होणाऱ्या महसुलामध्ये खालीलप्रमाणे विभागातंर्गत विभागणी करण्यात यावी.**

**२७.१** जलसंपदा विभागाने ५०%, मत्स्यव्यवसाय विभाग ३०% अशी विभागणी करुन महसूल एकत्रित निधीमध्ये त्या त्या विभागाच्या जमा लेखाशिर्षाखाली जमा करण्यात यावा व उर्वरित २०% निधी हा मत्स्यव्यवसाय विभागाकडे असलेल्या जलाशय/तलावाच्या विकासासाठी वापरण्यात येईल.

**२७.२** जलाशय/तलाव ठेका रक्कमेतून एकूण प्राप्त होणाऱ्या महसुलामधून मत्स्यव्यवसाय विभागाकडे राखीव ठेवण्यात येणाऱ्या २०% निधीमधुन जलाशयाच्या ठिकाणी मुलभूत सुविधा जसे जलाशय पोहोच रस्ता तयार करणे, पकडलेली मासळी उतरविण्यासाठी पकटी बांधणे, शासकीय मत्स्यबीज केंद्रातील दुरुस्ती करणे, मत्स्यबीज उत्पादन, तलावाचे मासेमारीचे सर्वेक्षण, सांख्यिकी माहिती गोळा करणे, तलाव ठेक्याने गेला नसल्यास चोरीने होणाऱ्या मासेमारीस प्रतिबंध करणे यासाठी कंत्राटी पध्दतीने कर्मचाऱ्यांची नेमणूक करणे इ.बाबींसाठी मत्स्यव्यवसाय विभागामार्फत खर्च करण्यात येईल. याप्रमाणे प्राप्त होणाऱ्या २०% निधी हा संबंधित सहाय्यक आयुक्त यांच्या नावे असलेल्या राष्ट्रीयकृत बँकेच्या खात्यामध्ये जमा करण्यात येईल. असा जमा होणारा निधी शासनाने विहित केलेल्या पध्दतीनुसार खर्च करण्याकरिता आयुक्त मत्स्यव्यवसाय महाराष्ट्र राज्य स्वतंत्र निकष निश्चित करतील. जलाशय/तलाव विकासासाठी राखीव ठेवण्यात येणाऱ्या निधीची आकडेवारी शासनास आयुक्त मत्स्यव्यवसाय वेळोवेळी सादर करतील. सदर निधीमधुन केलेल्या कामांचा तपशिल हा शासनास सादर करतील.

२८. सदर शासन निर्णयान्वये ज्या तलाव / जलाशयाचा ठेका देण्यात येईल त्यास सर्व तलाव / जलाशयास शासन निर्णय क्र. मत्स्यवि २०१६/प्र.क्र.९८/पदुम १३ दि. १७ ऑक्टोबर २०१६ अन्वये जाहिर केलेले "पिंजरा पध्दतीने मत्स्यसंवर्धन" करण्याबाबतचे धोरण लागू राहील.

**२९.** तलाव/जलाशय ठेक्याच्या अनुषंगाने उद्भवणाऱ्या वादासंदर्भात दाद मागण्याकरिता संबंधितास खालीलप्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्याकडे अपिल तसेच पुर्नरिक्षण दाखल करण्याची संधी उपलब्ध राहील. मात्र अपील/पुर्नरिक्षण अर्जावर एकदा घेतलेला निर्णय अंतिम राहील.

(अ) १००० हेक्टरपर्यंतचे तलाव/जलाशय संदर्भात आयुक्त मत्स्यव्यवसाय हे अपिलीय प्राधिकारी राहतील व सचिव (पदुम) हे पुर्नविलोकन प्राधिकारी राहतील.

(ब) १००० हेक्टरवरील जलाशय संदर्भात सचिव (पदुम) हे अपिलीय प्राधिकारी राहतील व मा.मंत्री मत्स्यव्यवसाय हे पुर्नविलोकन प्राधिकारी राहतील.

हे आदेश जलसंपदा विभागाच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र.४४/सिं.व्य (म)/१७, दिनांक २६.०५.२०१७ रोजी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०११३५६०५२९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2017.07.01 13:53:25 +05'30'

**(रविन्द्र गुरव)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
६. अप्पर मुख्य सचिव (महसूल) मंत्रालय, मुंबई ३२
७. प्रधान सचिव (वित्त) मंत्रालय मुंबई ३२
८. प्रधान सचिव (वने) मंत्रालय मुंबई ३२
९. प्रधान सचिव (ग्रामविकास) मंत्रालय मुंबई ३२
१०. सचिव (सहकार) मंत्रालय मुंबई ३२
११. प्रधान सचिव (आदिवासी विकास) मंत्रालय मुंबई ३२
१२. प्रधान सचिव (सामाजिक न्याय) मंत्रालय मुंबई ३२
१३. सचिव (जलसंपदा) मंत्रालय मुंबई ३२
१४. सचिव (लक्षेवि) मंत्रालय मुंबई ३२
१५. आयुक्त मत्स्यव्यवसाय महाराष्ट्र राज्य, मुंबई
१६. आयुक्त सहकार पुणे
१७. सर्व विभागीय आयुक्त
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
२०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मत्स्योदयोग विकास महामंडळ, मुंबई
२१. सर्व आयुक्त महानगरपालिका

२२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णाखोरे विकास महामंडळ सिंचन भवन पुणे
२३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
२४. कार्यकारी संचालक महाराष्ट्र विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
२५. कार्यकारी संचालक महाराष्ट्र तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
२६. कार्यकारी संचालक , कोकण पाटबंधारे विकास महामंडळ ठाणे
२७. सर्व उपायुक्त, मत्स्यव्यवसाय
२८. सर्व विभागीय सहआयुक्त निबंधक सहकारी संस्था
२९. उपनिबंधक सहकारी संस्था (मत्स्य) आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई.
३०. सर्व जिल्हा सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था (दुग्ध)
३१. सर्व जिल्हा मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी
३२. महालेखापाल (लेखापरिक्षक / लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
३३. वित्त विभाग (व्यय २) मंत्रालय मुंबई ३२. / निवड नस्ती.